हिंदी वसाहतीमध्ये क्रांती घडवून आणणारे हेच अंताजी होत. त्यांनी बाजीरावांच्या बाजूला सर्व पुढाऱ्यांची सहानुभूती मिळविली नि त्यांनीच मुख्यतः ज्या मराठ्यांच्या मोहिमेने बहुतेक मराठ्यांचा प्रदेश पोर्तुगीजांच्या सत्तेतून सोडवला, ती चिमणाजीआप्पांची मोहीम घडवून आणली.

परंतु याच अवकाशांत नि वसई पडण्याच्या पूर्वी, नादिरशहाने हिंदुस्थानवर स्वारी केली. नि दिल्ली त्याच्या हातात पडली. मराठ्यांचे दूत बाजीरावांस लिहितात- "तहमास्फलाखान काही देव नाही जो पृथ्वी कापून काढील. जबरदस्ताशी सुलुख करील. म्हणून मातबर फौजेनिशी यावे. आधी जबरदस्ती नि मग सुलुख, आता सारे रजपूत नि स्वामी (बाजीराव) एक जागा झालिया निकाल पडेल. समस्तास (हिंदूंस) बुंदेले वगैरे एक जागा करून मोठा भाव दाखविला पाहिजे. नादिरशहा माघारा जात नाही. हिंदुराज्यावरी निघेल... रायांचे (सवाई जयसिंग) मनी राणाजीस तख्तावर बसवावे असे आहे. हिंदूराजे सवाई आदिकरून स्वामीचे स्वारीची मार्गप्रतिक्षा करतात. स्वामींचे पुष्टिबल होताच जाट वगैरे फौज दिल्लीवरी पाठवून सवाईजी आपण दिल्लीस जाणार."

(धोंडो गोविंदांचे बाजीरावास पत्र).

परंतु, वसई अजून पडली नव्हती नि बाजीरावांना वेळेवर तिकडे जाता आले नाही. त्यांच्या ह्या अडचणीमुळे ते अगदी चिडून गेले होते. ते लिहितात- "हिंदु लोकांस संकट घोर प्राप्त झाले आहे. अद्याप वसई आली नाही... ऐशास तमाम मराठी फौजा एक होऊन चमेलीपार व्हावे. त्यास (नादिरास) अलीकडे येऊ देऊ नये, असा विचार आहे."

परंतु त्यांचे दुर्दान्त धैर्य ह्या सर्व अडचणींना पायाखाली तुडवून अंती, अढळ राहिले. लगेच ते लिहितात- "आपली घरगुती भांडणे (रघुजीचे पारिपत्य वगैरे) बाजूला ठेवली पाहिजेत. आता सर्व हिंदुस्थानास एक शत्रु उत्पन्न झाला आहे. मी तर सर्व नर्मदा उतरून, सर्व मराठी सैन्य चंबळेपर्यंत पसरून देणार. मग, पाहू द्या, नादिरशहा कसा खाली येतो तो!"

(बाजीरावांची पत्रे)

हिंदूंच्या पुनरुत्थानाच्या आंदोलनाचे जे जे पुढारी झाले; त्यात सवाई जयसिंग हे इतर पुढाऱ्यांप्रमाणेच हिंदुत्वाचे एक कट्टे अभिमानी पुढारी होते. शिवाजी महाराजांच्या सर्व अनुयायांच्या अनेक पिढ्यांचे जे मुख्य ध्येय-हिंदुपदपादशाही- ती सर्व हिंदुस्थानभर करण्याच्या कार्याला, बाजीरावांची माळव्यावरची स्वारी, ही एक, पुढची पायरी होती. ही स्वारी हिंदूंच्या मोचनाकरिता, माळव्यात करावी, अशी विनंती बाजीरावांना करण्यास तेथल्या पद्दलित झालेल्या हिंदूंस सवाई जयसिंगांनीच प्रेरणा केली. आपल्या एका पत्रात हा सुविद्य देशभक्त रजपूत राजा लिहितो, "सिद्धश्री... नंदलालजी प्रधान नि भाईजी ठाकूर, संस्थान अंदोर, अमरगढसु महाराजाधिराज श्री सवाई जयसिंगजी कृत प्रणाम बंचजो... सो आपको लिखते है की बादशहाने चढाई की है, तो कुछ चिंता नही. श्री परमात्मा पार लगावेगा। बाजीराव पेशवेसे हमने आफ निसबत कोलवचन कर लिया है।" पुनश्च ते लिहितात- "हजार शाबास है आप सब मालवे सरदार एक रहके हिंदुधर्मका कल्याण होना और मालवेमे हिंदुधर्मकी वृद्धी होना, अस बात विचार कर मालवेमे से मुसलमानोंको नौमेद किये और हिंदुधर्म कायम रखा।"

(जयसिंगाची पत्रे, २६-१०-१७२१ इ.स.)

हिंदूंच्या मोचनाची नि हिंदुपदपादशाहीच्या स्थापनेची ही जी प्रचंड चळवळ झाली तिने मनुष्यांचा एक मोठा नेता निर्माण केला. तो म्हणजे बाजीरावांचा विख्यात पुत्र नानासाहेब होय. नानासाहेब, जेथे जेथे दृष्टीस पडतात- तेथे तेथे ते हिंदुत्वाचे रक्षक म्हणूनच दृष्टीस पडतात. ताराबाईला ते लिहितात- "मोगल केवळ हिंदुराज्याचे शत्रु, त्यास देखील अनुसंधाने होत असता सेवकच वाकडे वर्ततात हा दोष!"

पानिपतच्या समरभूमीवर जरी पुष्कळ नाश झाला, तरी सर्व नाश काही झाला नाही, कारण त्या युद्धातून दोन माणसे जगली नि त्यांनी हिंदुसत्तेचा पडता ध्वज सावरून धरला. नाना फडणवीस नि महादजी शिंदे.हिंदुसत्तेची बुद्धी, तिची तरवार, तिची ढाल, यांनी जवळ जवळ ५० वर्षे चिंतन केले. संचालनाचे काम केले. युद्धे केली आणि हे सर्व पानिपतचा घोर पराभव झाला असताही किंवा झाला म्हणूनच; कारण यांना आजपर्यंत झालेल्या सर्व आघातापेक्षा हा आघात प्रचंड होता- आणि हे सर्व सोसूनही अंती, हिंदुस्थानचे खरे राजेपद संपादन करण्यात त्यांनी यश मिळविले त्यावेळी घडून येणाऱ्या प्रत्येक गोष्टीमध्ये हिंदूंच्या यशश्चंद्राची कला उत्तरोत्तर, अखंड वर्धमान होत आहे याची जाणीव प्रत्येक राष्ट्रीयप्रवृत्तीच्या हिंदु मनाला किती पूर्णपणे झाली होती. आपल्या हिंदुत्वाविषयी तसेच जे आता निःसंदेह प्रस्थापित झाले होते त्या हिंदु साम्राज्याविषयी ते किती उत्कटत्वाने अभिमान बाळगीत होते, हे त्या वेळच्या कुशाग्र नि कुशल राजनीतिज्ञ लोकांच्या लेखनावरून उत्तम रीतीने ध्यानी येईल. गोविंदराव काळे हे प्रख्यात राजदूत पेशव्यांचे वतीने, निजामच्या दरबारी होते. महाराष्ट्राच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत ज्या वार्तेने कूटनितिज्ञ राजकारणी, सर्वांची हृदये आनंदाने उचंबळून गेली होती. ती नाना आणि महादजी यांच्या समेटाची वार्ता ऐकून, गोविंदराव काळे ह्यांनी खालील पत्र नाना फडणवीसांस लिहिलेः-

"पत्र पाहताच रोमांच उभे राहिले. अति संतोष झाला. विस्तार पत्री किती लिहू? ग्रंथचे ग्रंथ मनात आले. अटक नदीचे अलीकडे, दक्षिण समुद्रापावेतो, हिंदूंचे स्थान-तुरकस्थान नव्हे, हे आपली सीमा पांडवांपासून विक्रमाजितपावेतो, त्यांनी राखून, उपभोग घेतला. त्यामागे राज्यकर्ते नादान निघाले. यवनांचे प्राबल्य झाले. चकत्यांनी, (बाबरच्या वंशजांनी) हस्तनापूरचे राज्य घेतले. शेवटी आलमगिराचे कारकिर्दीत यज्ञोपवीतास साडेतीन रुपये जेजया बसून ओले अन्न विकत घ्यावे", अशी नौबत गुजरली.

त्या दिवसांत कैलासवासी शिवाजी महाराज शककर्ते नि धर्म राखते निघाले. त्यांनी किंचित् कोन्यांत धर्मरक्षण केले. पुढे कैलासवासी नानासाहेब नि भाऊसाहेब प्रचंड प्रतापसूर्य असे झाले की, असे कधी झाले नाहीत. हल्ली श्रीमंतांचे पुण्यप्रतापे करून नि राजेश्री पाटील बुवांच्या बुद्धी नि तरवारीच्या पराक्रमेंकरून, सर्व घरास आले. परंतु झाले कसे? प्राप्त झाले. तेणेकरून सुलभता वाटली. अगर मुसलमान कोणी असते तरी मोठे मोठे तवारिखनामे झाले असते. यवनांच्या जातीत इतकी गोष्ट चांगली झाल्यास गगनाबरोबर करून शोभवावी. आमचे हिंदूंत

गगनाइतकी झाली असता उच्चार न करावा हे चाल आहे. अलभ्य गोष्टी घडल्या. यवनांच्या मनात की, काफरशाही झाली असे बोलतात.

"लेकीन ज्यांनी ज्यांनी हिंदुस्थानांत शिरे उचलली त्यांची पाटीलबाबांनी फोडली. न लाभल्या त्या गोष्टी लाभल्या, त्यांचा बंदोबस्त शककर्त्याप्रमाणे होऊन उपभोग घ्यावे पुढेच आहे. कोठे पुण्याईत उणे पडेल आणि काय दृष्ट लागेल नकळे. झाल्या गोष्टी यात केवळ मूलुख, राज्य प्राप्ती इतकेच नाही तरी वेदशास्त्ररक्षण, गोब्राह्मणप्रतिपालन, सार्वभौमत्व हाती लागणे, कीर्तीयश यांचे नगारे वाजणे इतक्या गोष्टी आहेत. हे किमया साभाळणे हक्क आपला नि पाटील बाबांचा. त्यात वेत्यास पडला की, दोस्त दुष्मन मजबूत. संशय दूर झाला. अति चांगले. अति चांगले! दुष्मन उशापायथ्याशी लागून आहेत. चैन नव्हते. आपण लिहिल्यावरून मन स्वस्थ झाले." (इ.स. १७९३).

हे एकच पत्र -इतक्या सहज आणि इतक्या सौलभ्याने लिहिलेले हे एकच पत्र आपल्या सर्व इतिहासाचे अंगित इतक्या स्पष्टपणाने देत आहे की, थिल्लरपणाने लिहिलेले ग्रंथचे ग्रंथ यापेक्षा अधिक समज करून देऊ शकणार नाहीत. 'हिंदू आणि हिंदुस्थान' यांच्या उत्पत्तीविषयी स्वयंस्फूर्तीने त्यामध्ये अचूक उल्लेख केला आहे. आपल्या अगदी शेवटल्या पिढीपर्यंत, आपले पूर्वज, किती पूर्णपणाने ह्या संज्ञांना सादर मान देत होते, तद्रूप झाले होते. याचे इतके वक्तृत्वपूर्ण निदर्शन या पत्रात झाले आहे की, यापुढे अधिक उतारे देणे हे अगदी अनावश्यक आहे.

## ५. बुद्धिमांद्य - मुर्खत्व - नष्ट होवो

या प्रमाणे ‘हिंदु’ नि ‘हिंदुस्थान’ या शब्दांच्या इतिहासाचा माग थेट अत्यंत प्राचीन अशा वैदिक काळापासून तो अगदी अर्वाचीन हिंदु साम्राज्याचे पतन, इ.स. १८१८ साली झाले, तेथपर्यंत काढण्याचा प्रयत्न केल्यानंतर आता आम्ही हिंदुत्वाची मूलतत्वे काय आहेत, याचे विवरण वाचकांपुढे मांडण्याच्या मुख्य उद्देशाकडे वळण्याच्या परिस्थितीत आलो आहोत. आपल्या ह्या एकंदर परिशीलनांतून पहिली फलप्राप्ती झाली ती ही की, ‘हिंदु नि हिंदुस्थान’ हे शब्दद्वय, मुसलमानांनी मत्सरबुद्धीने आपल्याला लावले आहेत. अशा पक्रारचा जो एक, निराधार संशय आपल्यापैकी सदिच्छेच्या परंतु उतावीळ अशा काही लोकांच्या मनामध्ये उत्पन्न झाला होता. तो अगदी निर्मूल आहे हे सिद्ध झाले. आतापर्यंत, जे विवेचन झाले त्यानंतर हा संशय इतका खुळ्यासारखा वाटतो की, त्याचे उच्चारण करणे म्हणजेच, त्याचा निषेध करणे होय. महंमदाचा जन्म होण्याच्या पूर्वी- नव्हे प्रत्यक्ष अरब ही एक मानवीजाती आहे हे जगाला कळण्याच्या आधीपासून ह्या पुरातन राष्ट्राची ओळख, स्वतःमध्ये नि परकीयांमध्ये ‘सिंधु’ अथवा ‘हिंदु’ ह्या नावाने साभिमानतेने केली जात असे आणि अरब लोकांना ज्याप्रमाणे प्रत्यक्ष सिंधु ही नदी शोधून काढणे, शक्य नव्हते, तितकेच सिंधु अथवा हिंदु हे नाव शोधून काढणे शक्य नव्हते. हे नाव त्यांना त्यांच्या पूर्वीच्या इराणी ज्यू आणि इतर लोकांकडून कळले होते. परंतु हे एवढे भक्कम ऐतिहासिक पुरावेच कशाला? जर हे अभिधान खरोखरच निंदव्यंजक असते, तर आपल्या जातीतील हे शूरातले शूर आणि उत्तमांतले उत्तम असे पुरूष आहेत त्यांनीही ते निंदाव्यंजक अभिधान मान्य केले असते का? खरोखरीच, आपले पूर्वज अरबी नि फारशी भाषेविषयी अगदी एवढे काही अनभिज्ञ नव्हते! मुसलमान लोक आपल्याला ‘काफीर’ असेही म्हणत असत. मग हे नाव आपल्या पूर्वजांनी धारण केले असावे नि ते नाव आपले वैशिष्ट्यदर्शक समजून त्यासच ते चिकटून राहिले आहेत काय? मग हिंदु अथवा हिंदुस्थान या शब्दांच्या विषयातच त्यांनी काय म्हणून आपखुषीने हा राष्ट्रीय अपमान गिळून घ्यावा? ह्याचे कारण अगदी साधे आहे, ते हे की त्यांना आपल्या राष्ट्रीय परंपरेचे अधिक ज्ञान होते आणि राष्ट्रीय जीवनापासून आपणांपैकी काहींची जी कल्पना आहे त्यापेक्षा ते कमी तुटक झाले होते. आपणांपैकी, काही लोक जे आज सतत हिंदु हा शब्द संस्कृतमध्ये सापडत नाही असे प्रतिपादित आहेत त्याचे कारण हेच आहे. याच शब्दाचे ते मोठे काय? संस्कृत वाङ्मयामध्ये, किशन, बनारस, मराठा, शीख, गुजरात, पाटणा, सिया, जमना आणि ज्यांचा आपण व्यवहारांत रोज उपयोग करतो असे दुसरेही सहस्त्रावधी शब्द आहेत की, ज्यांचा उल्लेख आलेला नाही, मग काय एवढ्याचकरिता का ते शब्द, परकीय उत्पत्तीचे आहेत. म्हणून समजावयाचे? बनारस हा शब्द जरी, संस्कृतांत नाही तरी आपलाच आहे. कारण वाराणसी ह्या संस्कृत शब्दाचे ते प्राकृत स्वरूप आहे. वास्तविक एखादा प्राकृत शब्द, शुद्ध संस्कृतामध्ये असावा, अशी अपेक्षा करणे, हेच मुळी हास्यास्पद आहे. तरीही पण, एवढ्यावरच संपले नाही. हिंदू हा शब्द एका संस्कृत शब्दाचे प्राकृत रूप आहे आणि म्हणून तो शब्द संस्कृत वाङ्मयामध्ये आढळू नये, हे जरी साहजिक आहे, तरीसुद्धा हे प्राकृत रूपदेखील काही काही वेळेला संस्कृत वाङ्मयामध्ये

आढळून येते ही गोष्ट तर या शब्दांचे महत्व सिद्ध करणारे एक सबल प्रत्यंतर आहे. उदाहरणार्थ मेरुतंत्रामध्ये 'हिंदू' हा शब्द उपयोगात आणलेला आहे. महाराष्ट्रातील प्रख्यात संस्कृत कोशकार आपटे आणि बंगालमधील तारानाथ तर्कवाचस्पती यांनीही आपल्या कोशात त्याचा उल्लेख केला आहे आणि 'शिवशिव न हिंदुर्न यवनः' हे वाक्य तर इतके प्रचारात आहे की, त्याचा उल्लेख करण्याचीच आवश्यकता नाही.

आता हे शक्य आहे की, आधुनिक मुसलमानी फारशी भाषेत, या शब्दामध्ये थोडासा तिरस्कारदर्शक भाव आला असेल; परंतु एवढ्याने हे कसे सिद्ध होईल की, म्हणून तो मूलतःच तुच्छतादर्शक होता नि त्याचा अर्थ 'काळा' असा होता? फारशी भाषेमध्ये 'हिंदी' अथवा 'हिंद' या शब्दांचा उपयोग केला आहे. परंतु त्याचा अर्थ 'काळा' असा नाही आणि त्याचप्रमाणे हेही सर्वांना माहीत आहे की, 'हिंदू' प्रमाणेच त्यांची उत्पत्ती 'सिंधु' अथवा 'सिंध' यापासूनच झाली आहे. हिंदु याचा अर्थ, 'काळा' असा आहे म्हणून तो आपणास लाभला आहे, असे जर म्हणावयाचे तर मग 'हिंद' आणि 'हिंदी' हे शब्द जरी या शब्दांचा अर्थ 'काळा माणूस' असा होत नाही तरीही ते आपणास लाभले असे म्हणावयाचे का? वास्तविक सत्य असे आहे की 'हिंदु' हा शब्द इराणच्या प्राचीन 'झेंड' या भाषेपासून उत्पन्न झाला आहे; तो काही, मुसलमानी इराणच्या फारशी भाषेपासून उत्पन्न झाला नाही आणि त्या वेळेला 'हप्तहिंदु' याचा अर्थ, मात्र 'सप्तसिंधु' एवढाच होता. हा शब्द आपण त्यावेळी काळे होतो म्हणून शब्दशः लावता येणे शक्यच नव्हते. कारण अवेस्ताकालचे जे 'हिंदू' ते प्राचीन काळचे 'सप्तसिंधु' हे इराणी लोकांप्रमाणेच, सुंदर होते आणि वस्तुतः ते एकमेकांशेजारीच नि कधी कधी एकमेक एकत्रच रहात होते. अगदी अलीकडे म्हणजे ख्रिस्ती शकाच्या प्रभात काळी, पर्शियन लोक, आपल्या सीमेवरच्या प्रांतांना 'श्वेतभारत' म्हणून संबोधित असत. एवढ्याकरिता 'हिंदू' याचा अर्थ शाब्दिकरीत्या काळा मनुष्य असा होणे शक्य नाही.

आतापर्यंतच्या विवेचनात 'हिंदु' नि 'हिंदुस्थान' ही अभिधाने, आपली भूमी नि आपले राष्ट्र ह्यांचा देशभक्तियुक्त, साभिमान उल्लेख करण्याकरिताच, मुसलमानी इराण अथवा मुसलमान लोक ह्यांचा नामनिर्देशही नव्हता, तेव्हापासून उपयोगात आणीत असत हे भरभक्कम पुराव्याने सिद्ध केल्यानंतर हिंदु या नावाचा मोठेपणा नि त्याचा असलेला आपल्या हृदयातील प्रेमावरचा अधिकार, याच्याचविषयी विचार केला असता काही काही डोके फिरलेल्या धर्मवेड्या लोकांनी 'हिंदु' या शब्दाला गौरवयुक्त अर्थाने अथवा तिरस्कारयुक्त अर्थाने संबोधिले आहे. हे पहाणे, हा प्रश्न अगदी गौण स्वरुपाचा राहतो. स्वयं इंग्लंडमध्ये असा एक काळ होता, की 'इंग्लंड' हा शब्द त्याचे विजेते जे नॉर्मन लोक यांच्या दृष्टीने इतका तुच्छतादर्शक गणला जात होता की एकमेकांविरुद्ध शिव्यागाळी करण्याचे वेळी तो उपयोगात आणीत असत! "मी काय इंग्लिश मनुष्य होऊ?" असे विचारणे, म्हणजे स्वतःची विटंबना करण्याची पराकाष्ठा समजत असत. एखाद्या नॉर्मन मनुष्यास 'तू इंग्लिश आहेस' हे म्हणणे म्हणजे त्याचा अक्षम्य अपराध केल्यासारखे होते! परंतु एवढ्याकरिता इंग्लिश लोकांनी आपल्या जन्मभूमीचे नि राष्ट्राचे नाव बदलण्याचा प्रयत्न

केला काय? किंवा त्याला इंग्लंडचे ऐवजी 'नॉर्मंडी' हे नाव दिले का? किंवा 'इंग्लिश' हे नाव अव्हेरण्यात त्यांना मोठेपणा प्राप्त झाला असता काय? नाही. इतकेच नव्हे, तर त्यांनी आपले प्राचीन नाव वा वंश हे अव्हेरिले नाही. एवढ्याचकरिता आज आपण असे पहात आहोत की, 'नॉर्मन' हा शब्द ऐतिहासिक क्षेत्रातून खणून काढलेल्या चिजेप्रमाणे होऊन राहिला आहे नि 'नॉर्मंडी' या प्रांताला पृथ्वीच्या नकाशावर कुठेही स्थान नाही- आणि त्या वेळचे, ते तिरस्करणीय इंग्लिश लोक नि त्यांची इंग्लिशभाषा यांच्या आधीन आजपर्यंतचे जगांतील अत्यंत विस्तृत साम्राज्य समाविष्ट झाले आहे! आणि जरी इंग्लिश साम्राज्याचे वैभव हे महनीय आहे तरी हिंदुसाम्राज्याच्या वैभवाशी तुलना करण्यासारखे एकंदरीत त्याजजवळ काय आहे?

ज्यावेळी संघर्षाचा काळ असतो, त्यावेळी राष्ट्राराष्ट्रांच्या मनाची समता ढळते आणि जर फारशी किंवा इतर कोणी लोक 'हिंदु' या शब्दाने 'चोर' अथवा 'काळा माणूस' इतकाच अर्थ एकेकाळी जाणत असेल, तर त्यांनीही हे ध्यानात ठेवावे की, 'मुसलमान' हा शब्दसुद्धा हिंदूंनी काही नेहमी कोणा एका अभिलषणीय चारित्र्याच्या मानवजातीचा दर्शक म्हणून वापरलेला नाही. एखाद्याला मुसलमान अथवा त्याहूनही वाईट म्हणजे 'मुसंडा' म्हणणे हे त्याला पशू म्हणून म्हणण्यापेक्षा अधिक निंद्य समजत असत. अशा तऱ्हेची कठोर शिवीगाळ नि आपसांतील दोषारोप, हे जरी, ज्या वेळी प्राणांतिक झगडे सुरू असतात. जोपर्यंत पाशवी क्रोधानलाच्या ज्वाला भडकत असतात, तोपर्यंत अनिवार्य असले, तरी जेव्हा माणसे ह्या झटक्यातून शुद्धीवर येतात आणि स्वतःला सुसंस्कृत म्हणवू पहातात; तेव्हा तरी त्यांनी ते विसरावयास पाहिजे आहे. त्यातही आपणाला हे विसरून चालावयाचे नाही की प्राचीन 'ज्यू' लोक 'हिंदू' हा शब्द सामर्थ्य नि उत्साह दर्शवण्यासाठी योजीत असत. कारण आपले राष्ट्र नि आपली भूमी या गुणांनी अन्वित झालेली होती. 'सो हाब मो अल्लक' या नावाच्या एका अरबी महाकाव्यांत असे म्हटले आहे की आपल्याच सग्यासोयऱ्यांचे जुलूम हे हिंदूंच्या तरवारीच्या आघातापेक्षाही अधिक प्रखर नि भीषण असतात. स्वयं इराणी लोकांतच, शिवाय अशी एक म्हण आहे की 'हिंदूच उत्तर देणे' याचा अर्थ असा की, हिंदूंच्या तरवारीने शूरपणाने खोल घाव घालणे. बाबिलोन देशांतील लोक उत्तम कापडाला सिंधु असे म्हणत असत. कारण बहुशः ते 'सप्तसिंधु'मधूनच येत असे. याच गोष्टीवरून हेही सिद्ध होते की आपल्या देशाला ते आपल्या प्राचीन सिंधु याच नावाने ओळखीत असत. त्याचप्रमाणे प्राचीन बाबिलोनियन भाषेमध्येही ह्या शब्दाचा राष्ट्रीयवाचक अर्थाशिवाय दुसरा अर्थ अजूनपर्यंत आपणास उपलब्ध नाही.

आपल्या शेजारच्या अत्यंत प्राचीन आणि अत्यंत सुसंस्कृत अशा चिनी राष्ट्रांतील सुप्रसिद्ध प्रवासी जो युआनचंग, त्याने हिंदु ह्या अभिधानाचा काय अर्थ केला आहे ते पाहून कोणत्याही हिंदूला स्वतःबद्दल धन्यता वाटल्यावाचून रहाणार नाही. त्याने हिंदु या शब्दाचे साम्य 'इंदु' या शब्दाशी केले. याच्या प्रतिपादनार्थ तो पुढे असे म्हणतो की "जगाने या राष्ट्राला योग्य रीतीनेच, 'इंदु' हे नाव दिले. कारण ते आणि त्यांची संस्कृती ही जगतावरील मनुष्यांच्या उदास आणि संत्रस्त आत्म्याला शीतल चंद्रप्रकाशाप्रमाणे, सदैव आनंद आणि उत्साह यांचा झराच

भासला.” या सर्व गोष्टींवरून हे सिद्ध होत नाही काय, की आपल्या नावाविषयी लोकांच्या मनात आदर उत्पन्न करण्याचा मार्ग म्हटला म्हणजे ते नाव सोडून देणे किंवा ते नाकारणे, हा नव्हे तर आपल्या शस्त्रांच्या प्रभावाने ध्येयाच्या शुद्धतेने आणि आत्म्याच्या उदात्ततेने त्या नावाला मान्यता मिळविणे नि त्याच्या पुढे सर्व जगास सन्मानाने मान लववावयास लावणे हाच तो मार्ग होय. आपण जरी काही आपल्यातीलच बांधवांना त्यांच्या स्वेच्छेच्या वारूवर यथेच्छ आरोहण करण्याची परवानगी दिली नि त्यांनी जणगणनेच्या वेळी स्वतःस हिंदूंच्या ऐवजी आर्य म्हणून नोंदवून घेतले तरी त्यापासून अधिक ते काय लाभणार? केवळ ‘आर्य’ ह्या पवित्र नावास मात्र ते स्वतःच्या हीन स्थितीला ओढतील आणि कोशामध्ये गुलाम, दास या अर्थाच्या शब्दांमध्ये आणखी एक शब्द भरीला घालतील. हे तोपर्यंत की जोपर्यंत आपले राष्ट्र त्याचे पूर्वीचे बल आणि मोठेपणा संपादित करीत नाही.

परंतु हिंदु नि हिंदुस्थान ही अभिधाने आपण, नाकारावीत; ह्या खुळ्या सुचनेच्या विरुद्ध गंभीर वादविवाद करावयाचे जरी आपण क्षणभर सोडून दिले आणि परक्यांनी द्‌वेषबुद्धीने, ही नावे आपणास दिली अशी मूर्खपणाची विचारसरणी क्षणभर मान्य केली तरीही आम्ही इतकेच सरळ विचारतो की या नावाचा अव्हेर करणे नि दुसरे एखादे राष्ट्रीय नाव धारण करणे हे शक्य आहे काय? हल्ली जी परिस्थिती आहे ती अशी आहे की, हिंदु हा शब्द आपल्या जातीची जणू एक पताकाच होऊन बसली आहे आणि ज्या गोष्टींनी आपली जातीय एकी ही केप कामोरिनपासून तो काश्मीरपर्यंत नि अटकेपासून कटकपर्यंत बलवत्तर केली जाते नि अखंड टिकविता येते अशा गोष्टींपैकी एक प्रमुख गोष्ट होऊन बसली आहे. आपल्याला असे वाटते काय की, एखाद्‌या टोपीप्रमाणे ते आपल्याला सहज बदलता येईल? एकदा, असे झाले की, एका सज्जन नि देशभक्त गृहस्थाने जनगणनेच्या वेळी स्वतःला ‘हिंदू’ऐवजी आर्य म्हणून नोंदवून घेण्याचे ठरविले नि याचे कारण हेच होते की, प्रथम इराणी लोकांनी आपणास तुच्छतादर्शक हिंदु या नावाने संबोधले होते नि या शब्दाचा अर्थ काळा माणूस, असा होतो. अशा प्रकारचे जे असत्य सर्वत्र पसरविले होते. त्यालाच हे गृहस्थ बळी पडले. ह्या गृहस्थांशी, वेळेच्या अभावी मला काही साग्र वादविवाद करता आला नाही; नि म्हणून मी त्यांस मात्र त्याचे नाव काय? एवढाच प्रश्न केला. त्याने सांगितले की ‘माझे नाव तक्तसिंह’. मी पुढे म्हणालो, “माझ्या सज्जन मित्रा, हिंदु या नावाच्या उत्पत्तीसंबंधी, अजून द्‌विधा मत तरी आहे. परंतु तुझे नाव मात्र निर्विवादपणे धेडगुजरी आहे. नि म्हणून नोंदणी करतांना प्रथम तेच ‘मौग्दलायन’ किंवा ‘सिंहासनसिंह’ अशा प्रकारे शुद्ध आर्यभाषेमध्ये, बदलून लिहिले पाहिजे.” हे ऐकून क्षणभर त्याने हा विषय टाळण्याचा प्रयत्न केला. नि मग, मला दाखवू लागला की, पहा, हे असे करणे किती कठीण आहे. त्यामुळे माझ्या उद्‌योगधंद्‌याची सगळीच घडी विसकटून जाईल. सर्वात मोठी अडचण म्हणजे सगळ्या लोकांना मी कसे या माझ्या नवीन बनविलेल्या नावाने ओळखण्यास लावू? किंवा जोपर्यंत इतर सर्वजण मला, ‘तक्तसिंह’च म्हणण्याचा हट्ट धरीत आहेत तोपर्यंत मी कितीही स्वतःला ‘सिंहासन सिंह’ म्हणण्याचा अट्टाहास केला तरी त्याचा काय उपयोग होणार आहे? मी लगेच त्याला म्हणालो, परंतु जर तुझे स्वतःचे, जे

नाव, निर्विवादपणे, परकीय आहे ते बदलण्यास तुला इतके कठीण, इतकेच नव्हे, तर हानिकारक वाटते. तर मग तक्तसिंह सबंध जातीचे जे नाव ते बदलणे हे कितीतरी अधिक कठिण आणि अधिक हानिकारक असले पाहिजे? आणि तेही नाव मुळीच परकीय नाही तर वेद जितके आपले तितकेच ते नावही आपले आहे! -आणि कितीतरी निरर्थक! अमितकालापासून दृढीभूत झालेले नाव बदलणे हे किती व्यर्थ आहे. याची सत्यता या वैयक्तिक उदाहरणापेक्षाही पंजाबमधील आपल्या शीखबंधूंच्या पंथामध्ये चांगल्या रीतीने, निर्दिष्ट केली आहे. आपल्या हिंदुजातीतील अवतंस नि शूरांतले शूर अशा नरश्रेष्ठांची जी जमात नि जिला आपल्या महान गुरूने पसंत केली नि त्यावेळी विजयानंदाने गर्जना केली की "नीलवस्त्रके कपडे फाडे तुरकपठाणी अंमल गया!" आणि जी जमात घडण्याचे आद्य कारण म्हणजे -धर्म चलावन संत उवारण, दुष्ट दैत्यके मूल उपाटण, यहि काज धरा मै जनमम। समझ लेहु साधुसम मननम्। (परित्राणाय साधूनां विनाशायच दुष्कृताम। धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे।।)

अशा या जमातीतेच नाव 'खालसा'! ज्या साधुवृत्तीच्या नानकाला, आज प्रत्यही, 'वाह गुरूजीके फत्ते, वाह गुरूजीके खालसा' अशा अभिनंदनांनी वंदन होत आहे. तो गुरुनानक दुःखाने म्हणत असे, की क्षत्रियांही धर्म छोडिया म्लेंछ भाषा गहि। सृष्टि सब अकवर्ण हुई, धर्मकी गति रही!' 'दरबार', 'दिवाण', 'बहादुर' इत्यादी शब्द, चोरासारखे थेट आपल्या हरिमंदिराच्या अंतर्भागापर्यंत प्रविष्ट झाले आहेत! आपल्याला पुरातनकाळी, जे व्रण झाले होते त्यांचे हे वण आहेत. ते व्रण भरून निघाले. परंतु त्यांचे वण मात्र अजूनही दृश्य आहेत; नि आपल्या शरीरांपैकींच एक होऊन बसले आहेत. जोपर्यंत त्यांना खरवडून काढण्याचा प्रयत्न करणे, हे लाभापेक्षा हानीच अधिक करण्याचा संभव आहे. तोपर्यंत, आपल्याला जे जे काय करता येण्यासारखे आहे ते म्हणजे इतकेच की ते तसेच सहन करणे. कारण, ते व्रण, ज्या लढाया आपण रक्ताचे पाट वाहवून जिंकल्या नि अंती जेते झालो अशा लढायांमध्येच झालेले आहेत.

आणि जर कोणते शब्द, मग ते कितीही पवित्र वस्तूंशी संबंध झालेले असोत. बदलणे आणि त्यक्त करणे, अवश्य असेल तर ते शब्द हे होत. कारण ते सर्व निर्विवादरीतीने परकीय नि त्यांच्या वर्चस्वाचे अवशिष्ट असे भाग आहेत.

मग जे आपण या नावांना अपरिहार्य म्हणून राहू देतो इतकेच नव्हे तर त्यांच्याविषयी आसक्ती धरतो त्या आपणाला जी आपल्या जातीची नि देशाची, पाळण्यातली नावे आपल्या मूळपुरुषांनी पसंत ठरविलेली, सगळ्या जगांतल्या, अत्यंत प्राचीन आणि अत्यंत वंद्य अशा ग्रंथामध्ये, वेदांमध्ये -जी ग्रंथित केलेली अशी, 'हिंदू आणि हिंदुस्थान' ही नावे नाकारणे निव्वळ दांभिकपणाचेच ठरत नाही काय? सिंधुनदीच्या उभय तीरांवरील आपल्या लक्षावधी देशबांधवांनी कमीत कमी गेली चाळीस शतकेपर्यंत जे अभिधान, मोठ्या अभिमानाने धारण केले; ज्याने काश्मीरपासून केप कामोरिनपर्यंत नि अटकपासून कटकपर्यंत आपल्या सर्व देशाला कवटाळले. जे एका शब्दांत आपली जन्मभूमी आणि ज्ञात जी 'सिंधु' अथवा 'हिंदु' हिच्या भूगोलाची सर्व स्थितिस्थापकता दर्शविते, जे राष्ट्रमार्यस्यचोत्तमम्' अशा रीतीने इतर देशांपासून निवडून

काढण्याची खूण म्हणून समजले गेले ते हे अभिधान होय. याच अभिधानाकरिता, शत्रूंनी आमचा द्वेष केला, आणि याच्याचकरिता शालिवाहनापासून शिवाजीपर्यंतचे आपले योद्धे शतकांपाठीमागून शतके, संघर्ष टिकवून ठेवण्यात सहस्त्रांनी कामी आले! पद्मिनी आणि चितोड यांच्या जळून खाक झालेल्या राखेवर हाच 'हिंदू' शब्द छापला गेलेला आढळेल. तुलसीदास नि तुकाराम आणि रामदास नि रामकृष्ण यांनी हिंदु हेच नाव धारण केले होते. 'हिंदुपदपादशाही' हेच रामदासांचे स्वप्न होते. शिवाजीचे कार्य होते. बाजीराव आणि बंदाबहादूर, छत्रसाल आणि नानासाहेब, प्रताप आणि प्रतापादित्य, यांच्या महत्वाकांक्षेचा ध्रुवतारा होते. ज्या ध्वजाचे रक्षण करता करता पानिपतच्या समरभूमीवर एक लक्ष वीर शत्रूवर प्राणहारक वार करीत, मात्र, एकाच दिवसात धारातीर्थी पतन पावले; आणि तो भाऊही ज्याच्या अग्रभागी हातात समशेर असता, गारद झाला त्या ध्वजावर हाच शब्द कोरून काढला होता. या सर्व बलिदानानंतर याच 'हिंदुपदपादशाही' करिता नाना आणि महादजी यांनी राष्ट्रनौका खवळलेल्या सागरातून त्यातील सर्व खडकांना नि संकटांना टाळून चिरपेक्षित किनाऱ्याच्या अगदी समीप आणली होती. आजही हेच 'हिंदू आणि हिंदुस्थान' हे अभिधान, नेपाळच्या सिंहासना-पासून तो रस्त्यातील एखाद्या कटोऱ्यापर्यंत, लक्षावधी लोकांवर, स्वामित्व गाजवीत आहे. या शब्दांचा अव्हेर करणे म्हणजे, आपल्या लोकांचे प्रत्यक्ष हृदयच कापून फेकून देणे होय. ते करण्यापूर्वीच तुम्ही मरून जाल. हे करणे काही केवळ भयंकरच आहे असे नाही. तर ते व्यर्थही आहे. 'हिंदू नि हिंदुस्थान' हे शब्द त्यांच्या जागेवरून हलवू म्हणणे म्हणजे प्रत्यक्ष हिमालयलाच त्याच्या जागेपासून हलविण्याचा प्रयत्न करण्यासारखे आहे. भयंकर उत्पत्ती नि कल्पनेला स्तिमित करणाऱ्या घटना जो घडवितो, असा एखादा धरणीकंपच, हे कार्य करू शकेल!

'हिंदू नि हिंदुस्थान' या अभिधानांविरुद्ध जो आक्षेप की, हे शब्द परकीय लोकांनी आपल्याला लावले आहेत, त्यांचाच तेवढा विचार केला तर मात्र निर्विवाद सिद्ध झालेले ऐतिहासिक आधार निवेदन केले, की त्याचा पूर्णपणे निरास होईल. परंतु वस्तुस्थिती अशी आहे की, हा आक्षेप काही वेळेला एका अंतर्गत भीतीने संमिश्र झालेला असतो ती भीती म्हणजे अशी की, जर हे अभिधान आपण आदराने धारण केले तर जे जे असे करतील ते ते 'हिंदुइझम' या नावामध्ये समाविष्ट होणारे सर्व विचार आणि आचार यांच्यावर विश्वास ठेवणारे आहेत असे जग मानील. हिंदु मनुष्य म्हटला की तो अचूक रीतीने ज्याला हिंदुइझम असे समजतात, त्या सर्व गोष्टींवर विश्वास ठेवणारा असलाच पाहिजे, अशा प्रकारची एक भावना लक्ष्यात घेऊन बाह्यतः नसले तरी अंतःकरणातून जे एक भय वाटत असते, त्याच भयाच्या योगाने पुष्कळ लोक ही आपली अभिधाने परकीय लोकांनी शोधून काढली नाहीत यावर विश्वास ठेवीत नाहीत आणि त्यांचे हे भय काही सर्वस्वी अनाठायी नसते. परंतु ज्यांना असे भय वाटते, त्यांनी ते तसे स्पष्टपणे बोलून दाखविणे नि एवढ्याकरिता आम्ही हिंदु म्हणवून घेण्यास सिद्ध नाही असे म्हणणे हे अधिक सरळपणाचे होईल. परंतु मिथ्या नि अप्रतिपादक अशा आक्षेपाखाली लपू पहाणे हे केवळ वक्र वृत्तीचे द्योतक होईल. 'हिंदुत्व नि हिंदुइझम' यामध्ये दिसणाऱ्या वरवरच्या साम्याच्या योगाने, काही वेळेला

आपल्या हिंदु बांधवांमधील काही सदिच्छेच्या लोकांचा, मतिभ्रम केला जातो. या दोन शब्दांमधील अंतर, लवकरच स्पष्टपणाने दाखविले जाईल. येथे केवळ इतके सांगितले, म्हणजे पुरे होणार आहे की जर कोणता एखादा शब्द परकीय लोकांकडून आला असेल तर तो हा हिंदुइझम होय. आणि म्हणून आपण अशी सावधानता ठेवली पाहिजे की, आपले विचार या नवीन बनवलेल्या शब्दाने घोटाळून जाणार नाहीत. वेदांवर-सुद्धा ते स्वतंत्र धर्मग्रंथ आहेत, असा विश्वास न ठेवणारे लोकही इतर कोणत्याही हिंदूप्रमाणेच सर्वस्वी हिंदू असू शकतात. ही गोष्ट इतरांविषयी न बोलता मात्र जैनांविषयींच बोलले तरी, आपले सहस्त्रांनी जैनबांधव पिढ्यानपिढ्या स्वतःला हिंदु म्हणवून घेत आहेत. जर कोणी त्यांना तसे न म्हटले तर त्यामध्ये त्यांना त्यांचा अपमान झाल्याप्रमाणे वाटते. यावरूनच सिद्ध होत आहे. आम्ही याचा निर्देश येथे केवळ हे एक प्रत्यक्ष सत्यच आहे या दृष्टीने केला. त्याचे सविस्तर विवरण नि विवेचन आताच येथे करण्याचा आमचा मानस नाही ते लवकरच पुढे येणार आहे. तोपर्यंत आम्ही अशी आशा करतो की आम्ही कोणता निर्णय काढू याविषयी आमचे वाचक कसलाही संदेह बाळगणार नाहीत नि त्या योगाने आमच्या निर्णयाच्या महत्वाविषयी आपले मत पूर्वग्रहदूषित करून ठेवणार नाहीत. त्याचप्रमाणे हेही त्यांच्या ध्यानात आलेच असेल की आम्ही आतापर्यंत जे विवेचन केले ते कोणत्याही 'इझम'वरचे नाही. तर केवळ 'हिंदुत्व' याचे राष्ट्रीय, जातीय, संस्कृतिविषयक जे स्वरूप त्याचेच दिग्दर्शन केले आहे.

इतक्या विवेचनानंतर आपल्याला आता आजपर्यंत मानवी भाषेला माहित असलेल्या अत्यंत विस्तृत नि बुद्धीला भांबावून सोडणाऱ्या अशा एकीकरण कल्पनेच्या घटकांचे विवरण करण्यास काही प्रत्यवाय नाही. 'हिंदुत्व' हा शब्द मूळ हिंदु यापासून निघाला आहे. आपल्या जातीच्या अत्यंत प्राचीन नि अत्यंत पवित्र अशा ग्रंथांमध्ये सप्तसिंधु अथवा हप्तहिंदु हा शब्द ज्या भूभागामध्ये वैदिक राष्ट्र भरभराटीला आले त्याला लाविला आहे हे आपण पाहिलेच आहे. ही भौगोलिक कल्पना मूळ ध्यानात घेऊन, कधी आकुंचन पावत तर कधी विस्तार पावत परंतु अखंडसातत्याने हिंदु नि हिंदुस्थान या शब्दांशी संयुक्त झाली आहे नि अंती, कमीत कमी ५००० वर्ष उलटल्यानंतर हिंदुस्थान ह्या शब्दामध्ये सिंधुनदीपासून तो सिंधु (समुद्रा) पर्यंत, सर्व द्वीपकल्प समाविष्ट झाले आहेत. कोणत्याही एखाद्या लोकसमूहाला, एकीभूत करण्यास बलशाली बनविण्यास नि ऐक्याची भावना उत्पन्न करण्यास जे अत्यंत महत्वाचे कारण असते ते हे की, त्याला अंतरंगांतून एकीभूत झालेली नि बाहेरून सुस्पष्ट मर्यादेने आखलेली भूमी ही निवासस्थानाकरिता नि ज्या नामोच्चाराने आपल्या चिरवंदित मातृभूमीची मूर्ति नि तिच्या गतकालीन इतिहासाविषयी नितांत भक्ती हृदयात उत्थित होईल असे 'नामाभिधान', या दोन गोष्टी आवश्यक असतात. सुदैवाने ह्या दोन्हीही महत्वाच्या गोष्टी आपल्यास लाभल्या आहेत. आपला देश हा इतका विस्तृत आणि तरीही इतका सुस्पष्टरेखांकित आहे की तो इतर देशांपासून इतका असंदिग्ध रीतीने, विभक्त केला आहे. तरीही इतका सुसंरक्षित आहे की, जगातील इतर कोणताही देश निसर्गाने आपल्या करांगुलीने निरपवाद असा निराळा, एक भौगोलिक विभाग, म्हणून आखून दिलेला नाही आणि 'हिंदुस्थान' अथवा 'हिदु' हे नावही तसेच आहे. हे नाव एकताच

आपल्या हृदयामध्ये अगदी अचूक रीतीने आपल्या जन्मभूमीची मूर्ती उभी राहते. तिच्या भौगोलिक स्थूल स्वरूपाची उत्कट कल्पना केल्यानंतर जणु काय ती एक सजीव मूर्तीच होऊन उभी राहते. 'हिंदुस्थान' म्हणजे 'हिंदूंची भूमी'. त्या अर्थी हिंदुत्वाच्या मूलभूत गोष्टींपैकी ही भौगोलिक गोष्ट अवश्य असली पाहिजे. हिंदु हा एकतर स्वतः अथवा आनुवंशिकरीतीने मुख्यतः हिंदुस्थानचा रहिवाशी असला पाहिजे आणि ही भूमी त्याची मातृभूमी असली पाहिजे. अमेरिका नि त्याचप्रमाणे फ्रान्समध्ये हिंदु या शब्दाचा अर्थ सामान्यतः याच रीतीने कोणत्याही धर्माचा अथवा संस्कृतिचा संबंध लक्ष्यात न आणताच समजला जातो. जर हिंदु या शब्दाचा हा मूळ अर्थच प्रामुख्याने दाखविण्याचा प्रघात असता आणि सिंधु या शब्दापासून उत्पन्न झालेल्या प्रत्येक शब्दाप्रमाणे याचाही जर तोच अर्थ असता तर याचा अर्थ केवळ हिंदुस्थानचा रहिवाशी इतकाच हिंदी या शब्दाचा सांप्रत, जो अर्थ आहे तोच अर्थ टिकून राहिला असता.

**हिंदुत्व - यथार्थ सारसर्वस्व नि गर्मितार्थ**

**हिंदुत्वाची व्यवच्छेदक नि अव्यवच्छेदक लक्षणे**

परंतु आतापर्यंतच्या सर्व विवेचनांत आपण केवळ काय प्रत्यक्ष आहे याचाच अधिक विचार केला आहे. काय असते किंवा काय असावे याविषयी इतका विचार केला नाही. आता याचे कारण काही, काय असावे याविषयी उहापोह करणे हे योग्य नव्हे, असे नव्हे. उलट ते आवश्यक नि काही वेळेला तर अधिक उत्साहदायकच असते परंतु हेसुद्धा काय आहे, याविषयी निश्चित ज्ञान प्राप्त झाले म्हणजेच अधिक चांगल्या रीतीने करता येईल याकरिता हिंदुत्वाच्या आदितत्वांना निश्चित करण्याच्या प्रयत्नांत आपण अगदी सावध असले पाहिजे. नि सांप्रतच्या या शब्दाच्या घटकावयांवरूनच आपण त्याचा अर्थ करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. एवढ्याकरिता जरी हिंदू या शब्दाचा त्याच व्युत्पत्तीवरून निघालेल्या हिंदी या शब्दाप्रमाणे केवळ हिंदुस्थानचा रहिवाशी असा आर्थ झाला तरी तेवढ्यावरून एखाद्या मुसलमानाला तो हिदुस्थानचा रहिवाशी आहे एवढ्याचवरून हिंदु म्हणणे म्हणजे शब्दाच्या व्यावहारिक अर्थाचा अनर्थ करणे होईल, अशी आम्हाला भीती वाटते. आता हे शक्य आहे की पुढे भविष्यकाळी कधी तरी हिंदु या शब्दाचा अर्थ मात्र हिंदुस्थानचा रहिवाशी इतका आणि इतकाच होईल. तो दिवस तेव्हांच येईल की ज्या दिवशी सर्व संस्कृति नि धर्म याविषयीचा दुरभिमान दुसऱ्यांना दुखवूनही आपली स्वतःचीच प्रौढी मिरविण्याचे सोडून देईल आणि सर्व धर्म ज्या वेळी स्वतःचा अभिमान त्यक्त करून ज्या पायावर ही सर्व मानवी जात, डौलाने नि चिरस्थायित्वाने सुस्थित झाली आहे, अशा मूलभूत चिरंतन तत्त्वांचा ते एक संग्रह बनतील. परंतु जोपर्यंत ह्या अत्यंत वांच्छित एकीकरणाच्या पहिल्या किरणांचाही क्षितिजाचलावर, कुठे मागमूसही दिसत नाही, तोपर्यंत अस्तित्वात असणाऱ्या कठोर सत्याकडे काणाडोळा करणे हे केवळ मूर्खपणा होईल. जोपर्यंत इतर प्रत्येक धर्म हा ज्या योगाने वारंवार लढाईपर्यंत प्रसंग येतात; असली आपापली विशिष्ट मते सोडण्यास सिद्ध नाही. तोपर्यंत कोणत्याही एका संस्कृतीने नि राष्ट्रीय घटकाने आपली बंधने शिथिल करणे नि विशेषतः संघांतील दृढता नि सामर्थ्य वाढविणारी बंधने शिथिल करणे हे केव्हांही इष्ट होणार नाही. एखादा अमेरिकन

हिंदुस्थानचा रहिवाशी होऊ शकेल. तो जर खरोखरीच असा नागरिक होईल तर त्याला भारतीय किंवा हिंदी या नात्याने वागविणे हे न्याय्य होईल. परंतु जोपर्यंत तो संस्कृतिने नि इतिहासाने एक झाला नाही जोपर्यंत त्याच्या अंगांत आपले रक्त खेळले नाही नि जोपर्यंत तो आपल्या देशाला केवळ आवडीचा म्हणून नव्हे तर पूजास्थान म्हणून गणू लागला नाही तोपर्यंत त्याला आपल्या हिंदूंच्या संघांत सामील करून घेता येणार नाही. कारण जरी हिंदुत्वाचे पहिले लक्षण म्हणजे स्वतः किंवा वाडवडिलांच्या योगाने हिंदुस्थानचे नागरिक असणे हे आहे तरी ते काही हिंदुत्वाचे एकच एक लक्षण आहे असे नाही. कारण हिंदु या शब्दाचा अर्थ, केवळ भौगोलिक वैशिष्ट्यापेक्षा पुष्कळ अधिक आहे.

**रक्ताने एकत्वाचा स्नेहसंबंध**

हिंदू हा शब्द भारतीय अथवा हिंदी यांच्याशी समानार्थक नाही नि त्याचा केवळ हिंदुस्थानचा रहिवाशी एवढाच अर्थ नाही हे ठरल्यावर साहजिकपणे त्याच्या दुसऱ्या लक्षणाविषयी विचार करणे, ओघानेच प्राप्त होते. हिंदू भारतीय शासनाचे केवळ नागरिकच नाहीत कारण ते काही केवळ एका जन्मभूमीवर असलेल्या प्रेमानेच बद्ध झालेले नाहीत, तर एकाच रक्ताच्या बंधनांनीही ते बद्ध झाले आहेत. ते काही केवळ एकराष्ट्रीयच नाहीत तर एकजातीयही आहेत. जाती हा शब्द जन्-जायते उत्पन्न करणे या धातूपासून निघाला आहे. त्याचा अर्थ बंधुता, ज्यांची उत्पत्ति एकच आहे; ज्यांचे रक्त एकच आहे असा लोकसमूह असा होतो. ज्यांना ‘सिंधु’ असे म्हणत अशा वेदकालीन पितृऋषींपासून आमचा वंशोद्भव आहे. त्या समर्थ पूर्वजांचेच रक्त सतत परंपरेने आमच्या अंगात खेळत आहे असे हिंदुलोक स्वाभिमानाने मानतात. अनेकवार छद्मीपणाने जो एक प्रश्न विचारला जातो तोही आम्हाला चांगला माहीत आहे की, परंतु तुम्ही खरोखरच का एकजाती आहांत? तुमच्या अंगात एकच रक्त खेळत आहे, असे खरेच का म्हणता येथील? याचे उत्तर आम्ही फक्त प्रतिप्रश्नांतच देऊ की, ‘इंग्लिश लोक हे खरोखरीच का एकजाती आहेत? जगामध्ये इंग्रज रक्त, फ्रेंच रक्त, जर्मन रक्त किंवा चिनी रक्त अशा प्रकारची काही वस्तु आहे काय? जे आपआपसामध्ये भिन्न जाती असूनही लग्ने करतात आणि अशा रीतीने परकीयांचे रक्त मुक्तपणाने आपल्यात मिसळू देतात ते काय एका रक्ताचे म्हणावयाचे? स्वतःसिद्ध अशा एकाच जातीचे मानावयाचे? जर त्यांना तसे करण्यास प्रत्यवाय नसेल तर हिंदूंना तर नाहीच नाही. कारण ज्या जातिभेदाच्या यथार्थ स्वरूपाविषयी तुम्हाला गाढ अज्ञान आहे नि ज्याचा खरा अर्थ तुम्ही मुळीच उमगू शकला नाही; त्या जातिभेदसंस्थेने आमच्यामधील रक्ताची सरमिसळ होऊन ते एक होऊ शकले नाही असे तुमचे म्हणणे आहे. परंतु हे तुमच्या ध्यानात येत नाही की त्याच जातिभेदाने स्वकीय रक्तापेक्षा परकीय रक्ताचीच भेसळ आमच्यामध्ये न होऊ देण्याला अधिक सहाय्य केले. इतकेच नव्हे, तर सांप्रत जी जातिसंस्था अस्तित्वांत आहे तीच ब्राह्मणापासून तो चांडाळापर्यंत, एकच रक्त, प्रत्येकाच्या धमन्यांमधून वहात आहे. त्याचे पर्याप्त प्रमाण नाही काय? आमच्या कोणत्याही स्मृतिकडे नुसती ओझरती जरी दृष्टि वळविली; तरी अनुलोम नि प्रतिलोम विवाह हे त्या काळी सर्रास होत होते आणि त्याच्याच योगाने आज अस्तित्वात

असलेल्या अनेक उपजाती निर्माण झाल्या आहेत असे निःसंदेह रीतीने दिसून येईल. एखाद्या क्षत्रियाला जर शूद्र स्त्रीपासून पुत्र झाला तर त्या संततीच्या योगाने, 'उग्र' या नावाची जाती निर्माण होते. त्याचप्रमाणे जर एखादा क्षत्रिय या उग्र जातीतील स्त्रीच्या पोटी संतती निर्माण करील तर त्या योगाने 'श्वपच' जाती निर्माण होते. त्याचप्रमाणे एखाद्या ब्राह्मण स्त्रीला जर एखाद्या शुद्रापासून मुलगा झाला, तर त्या योगाने 'चांडाल' जाती उत्पन्न होते. वेदकालीन सत्यकामजाबालीपासून तो थेट महादजी शिद्यांपर्यंत आपल्या इतिहासाच्या प्रत्येक पानावरून असे दिसून येईल की आपल्या जातीच्या रक्ताची ही प्राचीन गंगा वेदकालाच्या उत्तुंग शिखरांपासून उद्भुत होउन आधुनिक इतिहासाच्या भूप्रदेशावर अव्याहत रीतीने अवतीर्ण झाली आहे; नि अशा रीतीने अवतीर्ण होतांना ती पुष्कळ संपन्न झाली आहे. पुष्कळ प्रवाहांना तिने आपल्यात मिसळून घेतले आहे. कित्येक पतित आत्म्यांना तिने पावन केले आहे. विस्तृतता, गंभीरता, संपन्नता यांनी प्रतिदिनी वाढत वाढत कुठे तरी आडरानांत नि वाळवंटात शुष्क होऊन जाण्याची आपत्ती तिने निरस्त केली आहे नि अशा रीतीने पूर्वीपेक्षा अधिक शुद्धतेने नि अधिक वेगवान होऊन ती आज अखंड वहात आहे. आपल्यामध्ये जे जे काही नापीक नि दरिद्री होते, ते ते सुपीक नि समृद्ध करण्याकरिता नि आपल्यामध्ये जे जे काही उन्नत आणि वर्धिष्णु होते त्याच्या वाढीच्या आडही न येण्याकरिता जी जी साधने, अत्यंत आवश्यक म्हणून आपल्या उदात्तचरित नि देशभक्त पूर्वजांना वाटली, त्या त्या साधनांच्या द्वारे ह्या पावन प्रवाहाला व्यवस्थितपणाने मार्ग आक्रमण करता यावा अशी व्यवस्था करणे हेच कार्य या जातिभेद संस्थेने केले आहे.

हे विधान ज्याप्रमाणे चार मुख्य जातींच्या संमिश्र विवाहापासून उत्पन्न झालेल्या उपजातींविषयी आणि चार मुख्य जाती नि या उपजाती यांच्यापासून उत्पन्न झालेल्या संततीविषयी खरे आहे त्याचप्रमाणे ज्या इतर जाती नि वंश कुठे तरी पुराण भूतकालाच्या अंधुक प्रकाशात स्वतंत्रपणे आपापल्या ठिकाणी बसत होत्या त्यांच्याही संबंधाने हे विधान, तितकेच लागू आहे. याचे प्रत्यंतर पहावयाचे असल्यास मलबार किंवा नेपाळमध्ये पहा, तेथे हिंदूतील उच्च जातीच्या पुरुषाला ज्या जाति परकीय मानल्या गेल्या आहेत; अशा जातीच्या स्त्रीशी लग्न करण्यास प्रत्यवाय नाही. या जाती परकीय आहेत ही कल्पना जरी खरी मानली तरी त्यांनी हिंदूंच्या संस्कृतिचे संरक्षण करण्यात जे प्रेम आणि शौर्य दाखविले त्यामुळे त्यांना आपल्या जातीत समाविष्ट करण्यात आले. इतकेच नव्हे तर सर्व बंधनांपेक्षाही अत्यंत कोमल असे जे विवाहबंधन, त्याने त्यास नित्याचे बद्ध करून टाकले. नागवंश हा द्रविड जातीपैकीच आहे काय? मग जेव्हा अग्निवंशांतील तरुणांना नागकन्या अर्पण केल्या नि ह्या दोन्हीही वंशांमध्ये जेव्हा चंद्रवंश आणि सूर्यवंश यांच्यातील क्षत्रियांनी आपल्या कुमारिकांची लग्ने लाविली; तेव्हा मग हे आणि ते असे भिन्नत्व कुठे राहिले? अगदी हर्षाच्या कारकीर्दीपर्यंत मग बुद्धकालीन जातीभेदाची घडी जेव्हा विस्खलित झाली होती; तेव्हांची गोष्ट सोडून दिली तरी -जातिजातीमधील विवाह ही एक रोजची गोष्ट होऊन बसली होती. उदाहरणार्थ पांडवांच्याच एका कुलाची गोष्ट घ्या. पराशर ऋषी हे ब्राह्मण होते. त्यांचे प्रेम एका कोळ्याच्या सुंदर कुमारिकेवर बसले नि त्या दोघांचे अपत्य

म्हणजे जगद्विख्यात व्यासमुनी झाले. ह्या व्यासांनी क्षत्रियकुलांतील राजकन्या अंबा नि अंबालिका यांच्या ठिकाणी दोन पुत्रांची उत्पत्ती केली. या दोन पुत्रांपैकी पांडु याने 'नियोग' पद्धतीचा अवलंब करून आपल्या बायकांना संतती उत्पन्न करण्याची अनुज्ञा दिली. त्या बायकांनी अज्ञात जातींच्या पुरुषांच्या प्रेमाची याचना करून आपल्या महाकाव्याच्या नायकांना जन्म दिला. ह्याचप्रमाणे त्या कालच्या कर्ण, बभ्रुवाहन, घटोत्कच, विदुर आणि अन्य व्यक्तींच्या इतिहासाविषयी उल्लेख न करता त्या काळाच्या मानाने आधुनिक अशा चंद्रगुप्ताचे उदाहरण पहाण्याविषयी आम्ही वाचकांना विनंती करतो. चंद्रगुप्ताने एका ब्राम्हण कन्यकेशी विवाह लावला; नि त्यांच्यापासून अशोकाच्या पित्याची उत्पत्ती झाली. या अशोकाने युवराज असतांना एका वैश्य तरुणीशी विवाह लावला. हर्ष, जातीचा वैश्य असून, त्याने आपली मुलगी एका क्षत्रिय राजपुत्राला दिली. व्याधकर्मा हा एका व्याधाचा मुलगा होता. त्याची आई त्या व्याधावर प्रेम जडलेली एक ब्राह्मणकन्या होती; नि हा व्याधकर्मा विक्रमादित्याचा यज्ञाचार्य झाला होता. सुरदास कृष्णभट हा जातीने ब्राह्मण असून एका चांडालकन्येवर इतका आसक्त झाला की, त्याने उघड रीतीने तिच्याशी विवाह लावून संसार थाटला आणि 'मातंगी पंथ' ह्या नावाच्या एका धार्मिक पंथाचा, तो आद्यप्रवर्तक बनला. हे सर्व लोक स्वतःला 'हिंदु'च म्हणवितात नि तसे म्हणविण्याचा त्यांना अधिकार पोचतो. एवढ्यावरच हा पुरावा संपला नाही. एखादा पुरुष अथवा एखादी स्त्री आपल्या कृतींनी आपल्या जातीपासून च्युत होईल नि दुसऱ्या जातीत ढकलली जाईल. "शुद्रो ब्राह्मणतामेति ब्राह्मणश्चैति शूद्रताम्।" "न कुलं कुलमित्याहुराचारं कुलमुच्यते। आचारकुशलो राजन् अह चामुत्र नंदते।। उपासते येन पूर्वां द्विजा संध्यां न पश्चितां। सर्वांस्तान्ने धार्मिको राजा शूद्रकर्माणि योजयेत्।।" ही आज्ञा काही नेहमी पोकळ धमकी नव्हती. कित्येक क्षत्रियलोक शेती अथवा दुसरे हलके धंदे पत्करून क्षत्रियाला मिळणाऱ्या मानाला आंचवत असत आणि दुसऱ्या कोणत्या तरी जातीत गणले जात असत. उलटपक्षी कित्येक शूर लोक नि काही वेळेला सबंध जातीची जाति आपल्या शूर कृत्यांनी क्षत्रियांचे हक्क नि क्षत्रियांच्या पदव्या पावून, क्षत्रिय म्हणून गणले जात असत. एका जातीतून बहिष्कृत होणे ही एक रोजचीच गोष्ट होती नि असे झाले म्हणजे त्यांचा दुसऱ्या कोणत्या तरी जातीत समावेश होत असे.

हे परिवर्तन केवळ वैदिक आज्ञेप्रमाणे प्रस्थापित झालेल्या जातीसंस्थेवर विश्वास असणाऱ्या हिंदूंमध्येच घडत असे, असे नाही तर अवैदिक असे जे हिंदूंचे पंथ आहेत त्यामध्येही घडत असे. बुद्ध कालामध्ये ज्याप्रमाणे एकाच कुटुंबामध्ये बाप बौद्ध, आई वैदिक धर्माची नि पुत्र जैनपंथाचा असा देखावा दिसत असे त्याप्रमाणे आजही आपल्याला आढळून येईल. जैन आणि वैष्णव यांच्यामध्ये गुजराथेत लग्ने होतात. त्याचप्रमाणे शीख नि सनातनी यांच्यामध्ये पंजाबात लग्ने होतात. शिवाय, आजचा जो मान-भाव किंवा लिंगायत शीख किंवा सतनामी हा कालचा हिंदू होय आणि आजचा हिंदु कदाचित उद्या लिंगायत, ब्रह्मी अथवा शीख होईल.

आणि 'हिंदू' हे अभिधान जसे आपल्या लोकांच्या एकजातीयत्वाचे पूर्ण दिग्दर्शन करू शकते तसे इतर नाव करू शकत नाही. आपल्यांपैकी काही आर्य होते, काही अनार्य होते. परंतु

आयर किंवा नायर आपण सर्व हिंदु होतो नि एकच रक्त आपल्या धमन्यांतून वहात होते. आपल्यापैकी काही ब्राह्मण आहेत आणि काही नामशूद्र अथवा पंचम आहेत. परंतु ब्राह्मण किंवा चांडाल, आपण सर्व हिंदू आहोत नि एकाच रक्तामांसाचे आहोत. आपणापैकी काही राक्षस होते नि काही यक्ष होते. परंतु राक्षस अथवा यक्ष आपण सर्व हिंदूंच आहोत. एकच रक्त अंगात खेळत आहे. आपल्यापैकी काही वानर होते नि काही किन्नर होते. परंतु वानर किंवा नर आपण सर्व हिंदु आहोत नि एकाच रक्ताचे आहोत. आपल्यापैकी काही जैन नि काही जंगम आहेत. जैन अथवा जंगम आपण सर्व हिंदूच आहोत नि एकाच रक्ताचे आहोत. आपल्यापैकी काही एकेश्वरवादी, काही जगदीशश्वरवादी काही आस्तिक, काही नास्तिक परंतु एकेश्वरवादी अथवा निरीश्वरवादी आपण सर्व हिंदूच आहोत नि आपल्यामध्ये एकच रक्त खेळत आहे. आपण काही केवळ एकराष्ट्रीयच नाही तर एकजातीय आहोत. जन्मतःच आपले बंधुत्व जडलेले आहे. दुसरा कसलाही प्रश्न नाही. हा मात्र अंतःकरणाचा प्रश्न आहे. आपल्याला असे वाटते की राम आणि कृष्ण, बुद्ध आणि महावीर, नानक आणि चैतन्य, बसव आणि माधव, रोहिदास आणि तिरूवेल्लर यांच्या अंगात जे रक्त खेळत होते, तेच रक्त सर्व हिंदु जातींमध्ये धमन्याधमन्यांतून खेळत आहे. हृदयाहृदयांतून स्पंदन पावत आहे. आपल्याला असे वाटते की आपण एका जातीचे आहोत. एका रक्ताच्या अत्यंत कोमल बंधनांनी बांधले गेलेलो आहोत आणि हे असे वाटते म्हणून हे असे असले पाहिजे.

एकंदरीत जर पाहिले तर सर्व जगामध्ये मनुष्य म्हटला की त्याची एकच जाती असली पाहिजे ती मानव जाती होय. आपण एकाच रक्ताच्या संचरण्याने जिवंत राहिलो आहोत नि ते रक्त म्हणजे मानवी रक्त, या व्यतिरिक्त जी अन्य भावना ती केवळ तात्पुरती सोईपुरती आणि केवळ सापेक्षतः सत्य आहे. तुम्ही ज्या ज्या कृत्रिम भिंती जातीजातींमध्ये निर्माण करता त्या भुईसपाट करण्याकरिता, निसर्गाचा सतत प्रयत्न चालू आहे. रक्तारक्तांचे संमिश्रण रोखून धरणे म्हणजे वाळूच्या पायावर इमारत उठविणे होय. सर्व धर्मसंस्थापकांच्या सर्व आज्ञांपेक्षांही स्त्रीपुरुषांमधले प्रेमाकर्षण हे अधिक बलवान ठरले आहे. इतकेच काय, परंतु अंदमानमधील मूळ रहिवाशांमध्येसुद्धा, आर्यरक्ताचे तुषार परस्परांत मिसळले आहेत. खरोखरीच जर बोलावयाचे तर आपल्याला मात्र इतकेच विधान करता येईल; की माझ्या धमन्यांमधून सर्व मानवी जातीचे रक्त खेळत आहे. मनुष्याची या ध्रुवापासून त्या धुव्रापर्यंतची एकी हेच सत्य आहे. इतर सर्व केवळ सापेक्षतः आंशिकतः तसे आहे.

आणि याच दृष्टीने जर पाहिले तर सर्व जगामध्ये फक्त हिंदूंना नि कदाचित ज्यू लोकांनाच केवळ यथार्थत्वाने आम्ही एकजाती आहोत, असे हक्काने म्हणता येईल. एका हिंदूचे दुसऱ्या हिंदूशी लग्न केल्याने फार तर त्याची जात जाईल. परंतु त्याचे हिंदुत्व जाणार नाही. एखाद्या हिंदूचा कोणत्याही श्रद्धावान अथवा पाखंडी अनुमानसिद्ध, तात्त्विक अथवा सामाजिक पद्धतीवर विश्वास बसला तर फार तर, त्याचा पंथ त्याला अंतरेल. परंतु त्याचे हिंदुत्व मात्र अबाधित राहील. कारण हिंदुत्वाच्या अत्यंत महत्वाच्या लक्षणांमध्ये हिंदूंच्या रक्ताचा वारसा असणे हे अत्यंत महत्वाचे लक्षण आहे. म्हणून जे जे सिंधुनदीपासून तो सिंधूपर्यंत (समुद्रापर्यंत)

पसरलेल्या भूमीवर, पितृभूमी म्हणून प्रेम करतात, त्यांना ज्या जातीने आपल्यात मिसळवून नि आपले करून घेऊन स्वतःची उत्क्रांती करून घेतली, त्या पुरातन 'सप्तसिंधु' जातीचे रक्त जे आपल्या अंगांत संचारत आहे असे अधिकाराने म्हणतात त्याच्याजवळ हिंदुत्वाची दोन लक्षणे उपलब्ध झाली असे म्हणता येईल.

**समान संस्कृति**

परंतु ही केवळ दोनच लक्षणे होतात. कारण थोड्या विचाराअंती हे ध्यानात येईल की, 'एक राष्ट्र नि एक जाती -ही दोनच लक्षणे म्हणजे हिंदुत्वाची काही सर्व लक्षणे होऊ शकत नाहीत. मुसलमानांपैकी, पुष्कळ लोक त्यांच्या, अज्ञानजन्य दुराग्रहापासून मुक्त होऊन आपल्या देशावर त्यांची पितृभूमी म्हणून प्रेम करू शकतील नि त्यांच्यापैकी जे देशभक्त नि उदारमनस्क आहेत ते असे सदैव मानीत आलेच आहेत. त्यांच्या धर्मांतराचा इतिहास जे धर्मांतर लाखो लोकांच्या विषयात जबरीने केले गेले आहे. त्यांच्या मनात आले तरी ते विसरू शकणार नाहीत नि तो इतिहास त्यांना असेच सांगेल की त्यांच्यामध्ये हिंदु रक्तच खेळत आहे. परंतु आपण जे सत्य जसे आहे तसेच विचारांत घेण्याचा निश्चय करून- ते कसे असावे अशा विषयीचा विचार पुढे ठेवून नव्हे- आज जो या विषयाचा उहापोह करीत आहोत तो करीत असता त्या मुसलमानांना हिंदु म्हणू शकू काय? काश्मीरमधील नि इतर प्रांतांतील कितीतरी मुसलमान त्याचप्रमाणे दक्षिण हिंदुस्थानामधील ख्रिश्चन लोक आपल्यांतील जातिबंधने इतक्या कडक रीतीने पाळतात की ते बहुधा लग्नसंबंध आपल्या जातीमध्येच घडवून आणतात. अशा रीतीने त्यांच्या रक्तात परक्यांची भेसळ जवळ जवळ झाली नाही आणि तरीही त्यांना आपण ज्या अर्थाने 'हिंदू' हा शब्द वापरतो त्या अर्थाने तो लावता येणार नाही हे उघड आहे. कारण आपण हिंदु लोक, एकाच जन्मभूमीवर असणाऱ्या प्रेमाने आणि एकच रक्त आपल्या हृदयांतील स्पंदन नि त्यासर्वच उसळणारी प्रेमाची ऊर्मी यांना जन्म देत असल्यानेच काही बद्ध झालो नाही; तर आपण सर्वजण आपल्या थोर संस्कृतिला, आपल्या हिंदूंच्या संचित ज्ञानाला जे वंद्य मानतो त्या योगानेही आपण बद्ध झालो आहो. 'संस्कृति' हा शब्द अत्यंत योग्य आणि सार्थ आहे. कारण त्यामध्ये संस्कृतभाषाही सूचित होते. याच संस्कृत भाषेमध्ये आपल्या हिंदुवंशांच्या इतिहासामध्ये जे काही संग्राह्य नि उत्तम होते; त्या ज्ञानाचा उच्चार झाला नि त्याचा संचयही ह्याच भाषेमध्ये करून ठेवला. आपण एकराष्ट्र आहोत. आपण एकजाती आहोत. आपली संस्कृती एक आहे म्हणून आपण एक आहोत.

**संस्कृति म्हणजे तरी काय?**

परंतु संस्कृति म्हणजे तरी काय? संस्कृति म्हणजे 'मानवी मनाचे आविष्करण' होय. संस्कृति म्हणजे मनुष्याने स्थूलसृष्टीचे काय रुपांतर केले आहे, याचा इतिहास होय. जर स्थूलसृष्टी ही परमेश्वराची निर्मिती आहे. हिचे सर्वोत्तम स्वरूप म्हणजे मानवी आत्म्याचा स्थूलसृष्टीवर नि मनुष्यावर सारखाच विजय होणे होय. जिथे जिथे मनुष्याला आपल्या आत्म्याचे समाधान होईल अशी जड वस्तूंची घटना करता येईल तेथे तेथे तितक्या प्रमाणाने संस्कृतीचा जन्म होतो नि जेव्हा सामर्थ्य, सौंदर्य आणि प्रेम यांच्याविषयीच्या मानवी स्वर्गीय आकांक्षा

परिपूर्ण करून परम आनंदाचे सर्व मार्ग शोधून काढून आयुष्याचा पूर्ण विकास नि त्याचे ऐश्वर्य यांचा मनुष्याला पूर्ण उपभोग घडतो तेव्हा संस्कृतीचा पूर्ण विजय होतो.

एखाद्या राष्ट्राच्या संस्कृतीचा इतिहास म्हणजे त्या राष्ट्राच्या विचारांचा, आचारांचा आणि संपादिताचा इतिहास होय. 'वाङ्मय आणि कला' ही आपल्याला राष्ट्राचे विचार निवेदित करतात. 'इतिहास आणि समाजरचना' यांच्यावरून राष्ट्राच्या कृत्यांची नि त्याने संपादित केलेल्या गोष्टींची आपल्याला जाणीव होते. यापैकी कोणत्याही विषयात मनुष्याला एकलकोंडे रहाता येत नाही. अंदमानच्या आदिम वन्य जातीच्या लहान ओबडधोबड पोखरलेल्या लाकडी नावेत बसून-तिला डुंगी म्हणतात- तिचेही अमेरिकेच्या अगदी आजकालच्या 'ड्रेडनॉट' जहाजांच्या घडण्यामध्येही काहीतरी अनुकरण आहेच आहे. पॅरीसमधील तरुणींच्या पोषाखामधील अगदी अलीकडची नवी टूम ही सुद्धा वास्तविक 'पातुआ' तरुणी आपल्या कंबरपट्ट्यामध्ये जो एकमात्र पानांचा झुंबका खोवतात त्याच्यापासून जन्म पावली आहे.

आणि इतके असूनही डुंगी ती डुंगीच राहीली आहे. 'ड्रेडनॉट ते ड्रेडनॉटच' आहे. या दोन्हींमध्ये सारखेपणापेक्षा वैसादृश्यच अधिक आहे, त्यामुळे त्यांच्यातले एकत्व उमगून पडत नाही. याचप्रमाणे हिंदूंनी इतर लोकांप्रमाणेच जरी पुष्कळ गोष्टी लोकांना दिल्या आहेत; लोकांजवळून घेतल्या आहेत; तरी त्यांची संस्कृति दुसऱ्या कोणत्याही संस्कृतीहून फार भिन्न आहे. त्याचप्रमाणे त्यांचे आपापसात कितीही जरी मतभेद असले तरी त्यांचे एकमेकांशी असलेले 'एक वाङ्मय' नि एक संस्कृति यांच्या योगाने जगामध्ये इतर ज्या संस्कृति आहेत त्यापैकीच हीही एक आद्य संस्कृति आहे. तिचा हा अधिकार कोणालाही अमान्य करता येण्यासारखा नाही.

'हिंदु लोकांना इतिहास नाही,' अशा प्रकारची जी स्वार्थमूलक किंवा अज्ञानजन्य समजूत आधुनिक जगामध्ये प्रचलित आहे त्या समजुतीने ज्यांचे कान भारले आहेत, त्यांना हे म्हणणे मोठे विपरीत वाटेल की जवळ जवळ हिंदु लोकांनीच आपला इतिहास जतन करून ठेवण्यात यश संपादन केले आहे. नि हे इतिहाससंरक्षण अनेक धरणीकंपांच्या धक्क्यांतून नि जलप्रलयांच्या आघातानंतरही केले आहे! हा इतिहास त्यांच्या वेदांपासून सुरू होतो नि हे वेद म्हणजे आपल्या जातीच्या इतिहासाचे विद्यमान असलेले पहिले प्रकरण होय. हिंदूंची प्रत्येक कन्या, पाळण्यात जे पहिले गीत ऐकते ते सीतेचे होय. आपल्यापैकी काही लोक रामाची अवतार म्हणून पूजा करतात. काही लोक त्याला वीर आणि योद्धा म्हणून पूज्य मानतात. सर्व लोक त्याला आपल्या जातीचा अत्यंत विख्यात सार्वभौम राजा मानतात. प्रत्येक हिंदूतरुणाच्या मारुती आणि भीमसेन, ह्या अखंड बलदायी नि शारीरिक उन्नतीच्या आदर्श देवता आहेत. सावित्री आणि दमयंती ह्या प्रत्येक हिंदुस्त्रीच्या अखंड पातिव्रत्याचे नि अव्यभिचारी प्रेमाचे ध्येय आहेत. गोकुळच्या त्या दिव्य गुराख्यावर राधेने जे प्रेम केले त्याचा प्रतिध्वनी जेथे जेथे हिंदु तरुण आपल्या प्रियकरणीचे चुंबन घेतो तेथे तेथे उठत असतो. कौरव पांडवांचे महायुद्ध, कर्णार्जुन, भीमदुःशासन यांची तुमुल द्वंद्वे ही जरी सहस्रो वर्षांपूर्वी कुरुक्षेत्रावर घडून आली आहेत. तरी आजही ती प्रत्येक झोपडी-झोपडीपासून तो तहत राजवाड्याराजवाड्यापर्यंत त्यातील हृदय हालवून सोडणाऱ्या रसांसह

